<u>कोषागारातून रोख स्वरुपात देय.</u>

सन २०११-२०१२ या वित्तिय वर्षाकरिता व्यवसाय कराचे मंजूर अनुदानाचा "माहे जून ते डिसेंबर २०११ (सात महिन्यांकरीता )" दुसरा हप्ता. ३६०४- स्थानिक संस्था व पंचायत राज संस्था यांना नुकसान भरपाईच्या व अभिहस्तांकित रकमा देणे. (दत्तमत्त) मागणी क्रमांक एल-५ महाराष्ट्र राज्य व्यवसाय, व्यापार, आजिविका आणि नोक-या यावरील कर अधिनियम १९७५ अन्वये जिल्हा परिषदांना नुकसान भरपाईचे अनुदान म्हणून व्यवसाय कराच्या रकमा देणे. (३६०४०४२३ )

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
शासन निर्णय क्रमांक- बीयुडी -२०११/प्र.क्र. ५२३१/ वित्त-३, (२४)
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२, दिनांक :- १३ जुलै, २०११.

संदर्भ :- शासन निर्णय क्रमांक- बीयुडी -२०११/प्र.क्र. ५२३१/ वित्त-३, (२४)दि.९ मे,२०११

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र राज्य व्यवसाय, व्यापार, अजिविका आणि नोक-या यावरील कर अधिनियम १९७५ (व्यवसाय कर कायदा) दिनांक १ एप्रिल, १९७५ पासून अंमलात आलेला आहे. हा कायदा अंमलात येण्यापूर्वी राज्यातील काही स्थानिक स्वराज्य संस्था त्यांच्या कार्यक्षेत्रांमध्ये व्यवसाय कराची आकारणी आणि वसूली करीत होत्या. परंतु व्यवसाय कर अधिनियम १९७५ अन्वये सदर स्थानिक स्वराज्य संस्थांचे व्यवसाय कर आकारणी आणि वसूलीचे अधिकार काढून घेण्यात आले व त्याऐवजी संबंधित स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुदान रुपाने नुकसान भरपाई देण्याचे ठरले. तद्नुसार जिल्हा परिषदांना व्यवसाय कर अधिनियमाच्या कलम २९ अन्वये १९७५-७६ पूर्वी आर्थिक वर्षात सदर जिल्हा परिषदांनी वसूल केलेल्या रकमांपैकी सर्वाधिक रकमे- एवढया नुकसान भरपाईचे अनुदान देण्याचे राज्य शासनाने ठरविले असून,त्याप्रमाणे ३६०४ स्थानिक संस्था व पंचायत राज संस्था यांना नुकसान भरपाईच्या व अभिहस्तांकित रकमा देणे, १०८ व्यवसाय, व्यापार, अजिविका व नोक-यांवरील करांसंबधित अभिहस्तांकीत रकमा देणे.पंचायत राज संस्थांना अभिहस्तांकीत रकमा देणे या अर्थसंकल्पिय शिर्षाखाली २०११ - २०१२ या चालू वित्तीय वर्षी रु.२७,४२,०००/- (रुपये सत्तावीस लक्ष, बेचाळीस हजार फक्त) इतकी तरतूद मंजूर केली आहे.

२. सदर तरतुदी पैकी एप्रिल व मे २०११ या पहिल्या दोन महिन्याच्या कालावधीकरीता रुपये ४,५८,०००/- (रु. चार लाख, अठ्ठावन्न हजार फक्त) एवढी रक्कम या शासन निर्णयाद्वारे संबंधित जिल्हा परिषदांना मंजूर करण्यात येत आहे.

३. आता जून २०११ ते डिसेंबर २०११ या सात महिन्यांकरीता दुसऱ्या हप्त्यासाठी रुपये १५९८०००/- (रुपये पंधरा लाख अठठयाण्णव हजार फक्त) एवढया रकमा या शासन निर्णयान्वये संबंधीत जिल्हा परिषदेच्या मुख्य कार्यकारी अधिकारी यांच्या अधिनस्त ठेवण्यांत येत आहेत. अशा प्रकारे माहे डिसेंबर, २०११ पर्यंत एकूण रु. २०५६०००/- (रु.वीस लाख छप्पन्न हजार इतकी व्यवसाय, व्यापार, आजिविका अणि नोक-यावरील कराची रक्कम संदर्भाधीन जिल्हा परिषदांना सुपूर्द करण्यात आल्या आहेत.

४. सदरची रक्कम सोबत जोडलेल्या विवरणपत्र "अ" मधील रकाना क्र. ५ मध्ये दर्शविल्याप्रमाणे जिल्हा परिषदांना मंजूर करण्यात येत आहे. यावरील खर्च मागणी क्र. एल ५ लेखाशिर्ष ३६०४- स्थानिक संस्था व पंचायत राज संस्था यांना नुकसान भरपाईच्या व अभिहस्तांकीत रकमा देणे. दत्तमत १०७ व्यवसाय, व्यापार, आजिविका व नोक-या यावरील करासंबंधात अभिहस्तांकीत रकमा देणे याखाली चालू वित्तीय वर्ष २०११-२०१२ या खाली खर्ची घालावा.

४. या शासन निर्णयाव्दारे मंजूर करण्यात आलेल्या अनुदानाची रोख रक्कम कोषागारातून द्यावयाची आहे. संबंधित जिल्हा परिषदेच्या मुख्य लेखा व वित्त अधिका-यांनी तयार केलेली देयके जिल्हा परिषदेच्या मुख्य कार्यकारी अधिका-यांकडून प्रतिस्वाक्षरीत करण्यात येऊन कोषागारास सादर केलेल्या देयकावर अनुदानाची रोख रक्कम कोषागार अधिका-यांकडून देण्यात येईल. लेखा परिक्षणाचे काम हाती घेता यावे यासाठी महालेखापाल महाराष्ट्र (एक) मुंबई/नागपूर (दोन) यांना सर्व सुविधा उपलब्ध करुन देण्यात येतील या शर्तीच्या अधीन राहून सदरचे अनुदान मंजूर करण्यात येत आहे.

५. जिल्हा परिषदेच्या मुख्य कार्यकारी अधिका-यांनी कोषागारातून काढलेल्या रकमेबाबतची माहिती शासन परिपत्रक,ग्राम विकास विभाग क्र.आररीएन १०८९/रीआर ३०२७/२८, दिनांक ५ सप्टेंबर १९९० ला जोडलेल्या विहित प्रपत्रात या कार्यासनाकडे तावडतोब पाठवावी. या शासन निर्णयाची प्रत मिळाल्याची पोच द्यावी.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यांत आला असून, त्यांचा संगणक संकेतांक २०११०७१३१२५२४०००१ असा आहे.

७. हा शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक :अंदाज-२०.१०/ सीआर-६५/ अर्थसंकल्प-३, दिनांक ३१ मार्च,२०११ व पत्र क्र.बीजीटी २०११/प्र.क्र.३६/वित्त-१/ दि.७/६/११ अनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( प्रि. शं. कांबळे )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रति,

१) सर्व विभागीय आयुक्त,

२) आयुक्त, मुंबई विभाग आणि प्रमुख समन्वय प्राधिकारी, नवी मुंबई

३) महालेखापाल, महाराष्ट्र - १ (लेखा परिक्षा) मुंबई.(५ जादा प्रतीसह)

४) महालेखापाल, महाराष्ट्र - २ (लेखा परिक्षा) नागपूर..(५ जादा प्रतीसह)

५) महालेखापाल, महाराष्ट्र - १ (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई.(५ जादा प्रतीसह)

६) महालेखापाल, महाराष्ट्र - २ (लेखा व अनुज्ञेयता) नागपूर (५ जादा प्रतीसह)

७) मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद, ठाणे, नाशिक, धुळे, नंदूरबार,जळगांव, पुणे सातारा,सोलापूर, परभणी, हिंगोली, नांदेड, भंडारा, गोंदिया, चंद्रपूर, गडचिरोली.

८) उपमुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद, ठाणे, नाशिक, धुळे, नंदूरबार, जळगांव, पुणे, सातारा, सोलापूर, परभणी, हिंगोली,नांदेड, भंडारा, गोंदिया,चंद्रपूर, गडचिरोली.

९) जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा ठाणे, नाशिक, धुळे, नंदूरबार, जळगांव, पुणे, सातारा, सोलापूर, परभणी, हिंगोली, नांदेड, भंडारा, गोंदिया, चंद्रपूर, गडचिरोली.

१०) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, ठाणे, नाशिक, धुळे, नंदूरबार, जळगांव, पुणे, सातारा, सोलापूर, परभणी, हिंगोली, नांदेड, भंडारा, गोंदिया, चंद्रपूर, गडचिरोली.

११) मुख्य लेखा परिक्षक स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई, बेलापूर.

१२) उपमुख्य लेखा परिक्षक स्थानिक निधी लेखा, कोकण विभाग, नाशिक, पुणे, औरंगाबाद, नागपूर विभाग.

१३) वित्त विभाग (इएक्सपी-१५, बीयुडी ७, कराधान-३).

१४) कार्यासन क्र.वित्त-१,वित्त-७,वित्त-८, ग्राम विकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय,मुंबई.

१५) निवड नस्ती कार्यासन क्र.वित्त-३, ग्राम विकास व जलसंधारण विभाग.

१६) *संगणक कक्ष* ग्राम विकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय,मुंबई.

विवरणपत्र - अ

महाराष्ट्र राज्य व्यवसाय व्यापार आजिविका आणि नोकऱ्या वरील कर अधिनियम १९७५ च्या कलम २९ अन्वये जिल्हा परिषदांना देय असलेले अनुदानाचा दोन महिन्याकरीता दुसरा हप्ता.( शासन निर्णय ग्राम विकास विभाग क्र. बियुडी-२०१२/प्र.क्र.५२३१ /वित्त-३, दिनांक : १३/७/२०११ चे सहपत्र.)

(आकडे रुपयात)

| अ.क्र. | जिल्हयाचे नांव | सन २०११-२०१२ या वितीय वर्षासाठी मंजूर तरतूदरक्कमा ( रुपये) | या शासन निर्णयान्वये एप्रिल व मे, २०११ या दोन महिन्याकरीता मंजूर करावयाचा पहिला हप्ता. ( रुपये) | अक्षरी (रुपये) | या शासन निर्णयान्वये मंजूर करावयाच्या रकमा |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | ठाणे | ८०७००० | ४७०३०० | रुपये चार लाख सत्तर हजार तीनशे आठ फक्त | ६०५८०० |
| २ | नाशिक | १८३५७० | १०७००० | रुपये एक लाख सहा हजार नऊशे ब्याऐंशी फक्त | १३७६०० |
| ३ | धुळे | १५७०५० | ९१५०० | रुपये एक्क्याण्णव हजार पाचशे सत्तावीस फक्त | ११७७०० |
| ४ | नंदूरबार | १२९००० | ७५२०० | रुपये पंचाहत्तर हजार एकशे एकोणऐंशी फक्त | ९६७०० |
| ५ | जळगांव | ३८४८५२ | २२४३०० | रुपये दोन लाख चोवीस हजार दोनशे सत्त्याऐंशी फक्त | २८८४०० |
| ६ | पुणे | २४७७०१ | १४४४०० | रुपये एक लाख चव्वेचाळीस हजार तीनशे सत्तावन्न फक्त | १८५६०० |
| ७ | सातारा | ३२०२२० | १८६६०० | रुपये एक लाख शहाऐंशी हजार सहाशे वीस फक्त | २३९९०० |
| ८ | सोलापूर | २१५००९ | १२५३०० | रुपये एक लाख पंचवीस हजार तीनशे चार फक्त | १६११०० |
| ९ | परभणी | २२३३० | १३००० | रुपये तेरा हजार चौदा फक्त | १६७०० |
| १० | हिंगोली | ३८०० | २२०० | रुपये दोन हजार दोनशे पंधरा फक्त | ३२०० |
| ११ | नांदेड | ६३९१५ | ३७२०० | रुपये सदतीस हजार दोनशे एकोणपन्नास फक्त | ४७८०० |
| १२ | भंडारा | ५५३८३ | ३२३०० | रुपये बत्तिस हजार दोनशे शहात्तर फक्त | ४१५०० |
| १३ | गोंदिया | ५९९९८ | ३५००० | रुपये चौतीस हजार नऊशे सहासष्ठ फक्त | ४५००० |
| १४ | चंद्रपूर | ७७११८ | ४४९०० | रुपये चौव्वेचाळीस हजार नऊशे त्रेचाळीस फक्त | ५७७०० |
| १५ | गडचिरोली | १५०५४ | ८८०० | रुपशे आठ हजार सातशे त्र्याहत्तर फक्त | ११३०० |
| | एकूण | २७४२००० | १५९८००० | रुपये पंधरा लाख अठठयाण्णव हजार फक्त | २०५६००० |

(प्रि. शं. कांबळे)
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन